**मा. मुख्यमंत्री महोदय यांचेकडून प्राप्त प्रकरणांवर त्यांनी दिलेले आदेश / अभिप्राय संबंधित मंत्री महोदयांच्या निदर्शनास आणण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-१०१८ / प्र. क्र. १६० /१८ (र.व का.)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २० डिसेंबर, २०१८

**परिपत्रक :**

मा. मुख्यमंत्री महोदयांच्या मान्यतेसाठी विविध विषयांची प्रकरणे, विधानमंडळ प्रश्न, लक्षवेधी सूचना इ. च्या संचिका संबंधित मंत्री महोदयांमार्फत सादर होत असतात. तथापि सदर प्रकरणांवर मा. मुख्यमंत्री महोदयांची स्वाक्षरी झाल्यानंतर संचिका परस्पर संबंधित सचिवांकडे अग्रेषित करण्यात येत असल्याने संबंधित प्रकरणांवर मा. मुख्यमंत्री महोदय यांनी विशिष्ट आदेश दिले असल्यास याबाबत संबंधित मंत्री महोदय अनभिज्ञ राहत असल्याने बऱ्याचदा बैठकीच्या ठिकाणी, विधानमंडळ सभागृहात गोंधळाची स्थिती उत्पन्न होऊ शकते, असे मा. मंत्री, संसदीय कार्य यांनी निदर्शनास आणले आहे.

२. सबब सर्व मंत्रालयीन अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव यांना सूचित करण्यात येते की, विभागाने मा. मुख्यमंत्री महोदयांच्या मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रकरणांवर मा. मुख्यमंत्री महोदयांनी विशेष आदेश दिले असल्यास, काही निरीक्षणे नोंदविलेली असल्यास अथवा प्रस्तावामध्ये काही सुधारणा सुचविलेल्या असल्यास, अशी प्रकरणे मुख्यमंत्री सचिवालयाकडून प्राप्त झाल्यानंतर संबंधित सचिवांनी संबंधित मा. मंत्री महोदयांच्या निदर्शनास आणून संबंधित प्रकरणावर पुढील कार्यवाही करावी.

३. हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक **२०१८१२२०१५३५५७३१०७** असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Kumar Jain

Digitally signed by Dinesh Kumar Jain
DN: c=IN, o=All India Services, ou=CS Office Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ea3b8615acaf5a916338801298bc1b7123bd0cac17faf57848ccd7382e28252c, serialNumber=68589315014f4975fabfc7b90950c610d8b0535fa12b345b7e19fe84a006a889, cn=Dinesh Kumar Jain
Date: 2018.12.20 16:28:28 +05'30'

**( दिनेश कुमार जैन )**
**मुख्य सचिव**

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई,

२.सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य,

३.मा. राज्यपालांचे सचिव (५ प्रती),

४.मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव (५ प्रती),

५.मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,

६.मा.मुख्य सचिवांचे कार्यालय,

७.सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

८.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (५ प्रती),

९.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,

१०.सर्व मंत्रालयीन विभाग

११.निवड नस्ती.(कार्यासन-१८)